आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ अंतर्गत केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरण....
केंद्र हिस्सा - (लेखाशिर्ष २२२५ २२८२)
राज्य हिस्सा - (लेखाशिर्ष २२२५डी९४१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२३/ प्र. क्र. ०२/कार्यासन-०६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) जनजाती मंत्रालय, नवी दिल्ली, भारत सरकार यांचे पत्र F.No.20014/19/2018-Sch, Dt.19.03.2024.
३) आदिवासी विकास विभाग, शा.नि.क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२.कार्या-६, दि.१९.०६.२०२३
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. शिष्यवृ-१५२३/प्र.क्र. १५६/कार्या-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५ मधील केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती या योजनेकरीता केंद्र शासनाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये रु.२७०.३६ कोटी इतका निधी प्राप्त झाला आहे. त्यास अनुसरुन अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून केंद्र हिस्सा रु.१५०.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा रु.५०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पित तरतुदींमधून उपलब्ध करून दिलेल्या निधी वितरण मर्यादेत खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२३-२४ करीता मंजूर सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| केंद्रिय पुरस्कृत योजना - भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती | २२२५ २२८२ (केंद्र हिस्सा ७५%) | ३४, शिष्यवृत्ती व विद्यावेतने | ४५०.०० | ३००.०० | १५०.०० |
| | २२२५डी९४१ (राज्य हिस्सा २५%) | | १५०.०० | १००.०० | ५०.०० |
| | **एकूण** | | **६००.००** | **४००.००** | **२००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२००.०० कोटी (अक्षरी रुपये दोनशे कोटी) इतका निधी योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांचा तपशील, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील व वित्त विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३२११०२७२४४८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.21 16:08:22 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सचिव यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.